नव्हतें. त्यामुळें मी त्यांना (कौरवांना) पुष्कळ समजावलें. पण मोहामुळें त्यांनीं माझें ऐकलें नाहीं. भय दाखवून मी त्यांना त्रस्त केलें व पुन्हां रागावून मी त्यांची खरडपट्टी काढली. पण ते पूर्ण अधार्मिक झालेले व कालधर्मानें विनाशास्तव परिपक्व झालेले होते. धर्मानेंच ते युद्धांत वध पावले व स्वर्गांत गेले यांत कांहीं संशय नाहीं. पांडवांची जगांत कीर्ति झाली. तूं विचारलेल्या प्रश्नाचें हें उत्तर आहे.

"नंतर उत्तंकाच्या इच्छेनुसार श्रीभगवंतांनीं अर्जुनाला जें विश्वरूप दाखविलें होतें तें शाश्वत, वैष्णव स्वरूप प्रसन्न होऊन उत्तंकाला दाखविलें. सहस्र सूर्याप्रमाणें अथवा अग्नीप्रमाणें दीप्तिमान्, सर्व अंतराला व्यापून राहिलेलें, सर्वतोमुख असें महाभुज विश्वरूप असें परमश्रेष्ठ विष्णूंचें वैष्णव स्वरूप पाहून तो ब्राह्मण विस्मय पावला."

तात्पर्य स्वतः महाभारतकारांचा अभिप्राय, तत्कालीन भीष्मादिकांचे भगवंताविषयींचे अभिप्राय, त्यांची स्वतःची धारणा व त्यांचीं कृत्यें पाहिलीं तर भगवान् श्रीकृष्ण परमेश्वराचा अवतारच नव्हे तर पूर्णावतारच आहेत असें दिग्दर्शित करण्याचा महाभारतकारांचा स्पष्ट अभिप्राय आहे. त्यांचें ईश्वरी सामर्थ्य किती श्रेष्ठ आहे याचें वर्णन करीत असतांना संजय धृतराष्ट्राला म्हणतो कीं :—

**एकतो वा जगत्कृत्स्नमेकतो वा जनार्दनः ।**
**सारतो जगतः कृत्स्नादतिरिक्तो जनार्दनः ॥७**
**भस्म कुर्याज्जगदिदं मनसैव जनार्दनः ।**
**न तु कृत्स्नं जगच्छक्तं भस्म कर्तुं जनार्दनम् ॥८**

—महाभारत, उद्योगपर्व अ. ६८

"एका बाजूला संपूर्ण जग व एका बाजूला श्रीकृष्ण अशी वस्तुस्थिति निर्माण झाली तर सामर्थ्याच्या दृष्टीनेंच श्रीकृष्ण जगापेक्षां श्रेष्ठ ठरतील. मनानें श्रीकृष्ण सर्व जगाला भस्मसात् करूं शकतात. जग मात्र श्रीकृष्णांचें कांहींही करूं शकणार नाहीं."

भगवान् श्रीकृष्ण व भगवान् श्रीरामचंद्र या युगक्षणीं महान् परिवर्तन घडवून आणणाऱ्या व्यक्तींना किंवा विभूतींना आपल्या

देशांत अवतार म्हणून संबोधिण्यांत आलें असून श्रीरामचंद्रांना मर्यादापुरुषोत्तम तर भगवान् श्रीकृष्णांना पूर्णावतार अशीं विशेषणें लावण्यांत येत असतात. श्रीरामचंद्र व श्रीकृष्ण यांच्या रामायण महाभारत संहितेंत दिलेल्या उद्‌गारांवरून व व्यक्त झालेल्या धारणांवरून अवतारी पुरुष भगवान् रामचंद्रांचे ठिकाणीं रावणवधापर्यंत तरी आपण मनुष्य आहोंत हीच धारणा होती असें दिसतें. निदान त्या धारणेंविना दुसरी कोणतीही धारणा त्यांनीं व्यक्त केलेली नाहीं. रावणवधानंतर देवतांनीं या देवाला तूं देव आहेस असें सांगण्याचा प्रयत्न केल्यावरही त्यानें असें उत्तर दिलें आहे कीं,

**आत्मानं मानुषं मन्ये रामं दशरथात्मजम् ॥ ११**

वा. रामायण, युद्धकांड सर्ग ११७

"माझी अशी समजूत आहे कीं,मी मनुष्य असून दशरथाचा मुलगा आहे व माझें नांव राम आहे." महर्षि वाल्मीकींना राम हे महाविष्णूचा अवतार आहेत हें माहीत असलें तरी आपल्या ग्रंथाचे अभिनायक म्हणून महर्षींना जें वर्णन करावयाचें आहे, तें देव या नात्यानें करावयाचें नसून टाकीचे घांव सोसून देवपण मिळविलेले रामच वर्णन करावयाचे आहेत असें स्पष्ट दिसतें. रामायणामध्यें रामचंद्रांच्या मानवतेचे विशेष कसे दृष्टोत्पत्तीस येतात हें मी माझ्या श्रीरामायणावरील व्याख्यानमालेंत दाखवून दिलें आहे. श्रीकृष्णांनीं आपली ईश्वरी धारणा श्रीरामचंद्रांप्रमाणें पडद्याआड ठेवण्याचा कधींही प्रयत्न केला नसून प्रथमपासूनच ती अगदीं अनावृत शब्दांत व्यक्त केलेली आहे. इतकेंच नव्हें तर श्रीरामचंद्रांप्रमाणें व्यक्तिगत दुःखाचे आविष्कार, मोह व विकारवशतेचे आविष्कार, भगवान् श्रीकृष्णांचे चरित्रांत सहसा आढळावयाचे नाहींत. एका ठिकाणीं सुखदुःखमयता आढळत असली तर दुसऱ्या ठिकाणीं सदाचीच शुद्ध भावातीतता आढळते. स्वतःसिद्ध देवत्वाच्या पूर्णतेचा व साक्षित्वाच्या अवस्थेचा अखंड आविष्कार हें भगवान् श्रीकृष्णांच्या जीवनाचें स्वरूप आहे. याचीं दोन कारणें दिसून येतात.

जे 'राम' महर्षींना वर्णन करावयाचे आहेत त्यांचें स्वरूप रावणाच्या वधापर्यंत तरी देव म्हणून प्रकट होऊंच शकत नाहीं. रामचंद्रांच्या ज्या राक्षस राष्ट्राच्या विध्वंसाच्या महत्कृत्यामुळें ते महाकाव्याचा विषय झाले आहेत, तो विध्वंसच देवाकडून होऊं शकत नाहीं. उलट तो मानवाकडूनच झाला पाहिजे अशी अट आहे. मानवी अवस्था दूर सोडली तर हें कृत्य अशक्य असल्यामुळें येथें देवानें सर्वस्वी मानवतेचा अंगीकार केलेला आहे. मानवांना जीवनशास्त्राचें शिक्षण देऊन त्यांच्या जीवनाचें देवजीवनांत विकसन करण्यासाठीं स्वतंत्रपणेंच कसे प्रयत्न करतां येतील हें दाखविण्यासाठीं श्रीरामचंद्रांचा आविष्कार आहे. त्यामुळें तें जीवनही सरळ आहे. श्रीकृष्णांच्या जीवनांत संघर्षाच्या समस्या व सोडवावयाचे प्रश्न इतके विपुल, विशाल व सर्वगामी आहेत कीं त्यासाठीं दिव्यतेच्या पूर्ण आविष्काराचीच आवश्यकता आहे. परमेश्वरी तत्त्वाची ओळख पटण्याइतक्या आविष्कारानें येथें काम भागावयाचें नाहीं. याच अभिप्रायानें श्रीमत् भागवतकारांनीं परमेश्वराच्या सर्व अवतारांचें परिगणन करून शेवटीं असा निष्कर्ष काढलेला आहे कीं

**एते चांशकलाः पुंसः कृष्णस्तु भगवान् स्वयम् ।। २८**

– श्रीमद्भागवत प्रथम स्कंध अध्याय ३

" इतर सर्व अंशावतार असून श्रीकृष्ण मात्र पूर्णावतार आहेत."

याचा अर्थ इतकाच कीं, इतर प्रत्येक अवताराच्या परिस्थितींतील समस्या सोडवावयासाठीं दिव्यतेच्या कांहीं कणांचा आविष्कार पुरेसा होऊं शकला. पण श्रीकृष्णांच्या वेळच्या परिस्थितींत मात्र दिव्यतेच्या संपूर्ण आविष्काराचीच आवश्यकता होती. कोणी अधिक, कोणी कमी हा प्रश्न कांहीं येथें उत्पन्न होऊं शकत नाहीं. भगवान् श्रीकृष्णांच्या जीवनकाळीं त्यांना हें देवत्व प्राप्त झालें नसून पुढें त्यांच्या भक्तांनीं त्यांना तें दिलेलें आहे अशी पुष्कळ भारतीय व अभारतीय विद्वानांची धारणा आहे. त्यावर उत्तर देतांना गीतारहस्यांत लोकमान्य टिळक म्हणतात :—

"कोणाला देव मानावें व कोणाला देव मानूं नये याबद्दलची आधुनिक तार्किकांची समजूत आणि दोनचार हजार वर्षांपूर्वीच्या लोकांची समजूत यांत महदंतर पडलेलें आहे आणि ज्ञानी पुरुष स्वतःच ब्रह्ममय होतो असा श्रीकृष्णापूर्वीच्या उपनिषदांत सिद्धांत केलेला असून मैत्र्युपनिषदांत रुद्र, विष्णु, अच्युत, नारायण हे सर्व ब्रह्मच आहेत असें स्वच्छ म्हटलें आहे. मग श्रीकृष्णास परब्रह्मत्व येण्यास वेळ लागण्याचें कारण काय ? इतिहासाकडे पाहिलें तरी बुद्ध आपल्या स्वतःला ब्रह्मभूत म्हणत असून (सेलसूत्त १४ थेर; गाथा ८३१ ) त्याच्या हयातींतच त्यास देवाचा मान मिळूं लागला होता व त्याच्या मरणानंतर लवकरच त्यास देवाधिदेवाचें किंवा वैदिक धर्मांतील परमात्म्याचें स्वरूप प्राप्त होऊन त्याची पूजाही सुरू झाली होती असें विश्वसनीय बौद्ध ग्रंथांवरून दिसून येईल. ख्रिस्ताचीही गोष्ट तशीच आहे. बुद्ध व ख्रिस्त धर्मांच्या मूळ-पुरुषांप्रमाणें भागवतधर्माच्याही प्रवर्तकास पहिल्यापासूनच ब्रह्माचें किंवा देवाचें स्वरूप प्राप्त होण्यास कोणतीच हरकत येण्याचें कारण नाहीं." ( गीतारहस्य प्रत सन १९१५ पृष्ठ ५४४ )

लोकमान्य टिळकांनीं येथें अवतारवादाची निराळ्या प्रकारें मांडणी केली आहे. श्रीकृष्ण हे स्वतः अवतार होते वा नव्हते या प्रश्नांत न पडतां अनुचरांच्याकडून त्यांना देवत्व अथवा अवतारत्व त्यांच्या जीवनाच्या काळांतच ते केवळ महापुरुष असले तरी प्राप्त होण्याची कशी शक्यता आहे येवढ्याचेंच त्यांनीं विवेचन केलेलें आहे. एक गोष्ट त्यावरून स्पष्ट होऊं शकते. ती ही कीं, श्रीकृष्णांच्या काळींच लोक त्यांना अवतार मानूं लागले होते. एका वेगळ्या दृष्टीनें या अवतारवादाची कांहीं संगति लावतां येण्या-सारखी आहे किंवा नाहीं हें पहाणें अवश्य आहे. भगवान् श्रीकृष्ण आपल्या अवतारत्वासंबंधानें बोलत असतांना अशी प्रतिज्ञा करीत आहेत कीं:—

**जन्म कर्म च मे दिव्यं एवं यो वेत्ति तत्त्वतः ।**
**त्यक्त्वा देहं पुनर्जन्म नैति मामेति सोऽर्जुन ॥** गीता अ. ४–९

याप्रमाणें माझें दिव्य जन्मकर्म जो तत्त्वतः ओळखतो तो पूर्णपणें माझ्यांत येऊन मिळतो, त्याला पुनः जन्म म्हणून नाहीं. वस्तुतः श्रीकृष्णांचा जन्म ज्या विशिष्ट परिस्थितींत व ज्या दिनांकीं झाला त्याची वारंवार उजळणी अनेक ग्रंथांतून झालेली असून कृष्णाष्टमीच्या दिवशीं त्यांचा जन्ममहोत्सव करण्याची प्रथा आज शतावधि वर्षें हिंदुस्थान देशांत चालू आहे. या दिवशीं व्याख्यान, कीर्तन-प्रवचनादिकांच्या द्वारा त्यांच्या जन्मकर्माची वारंवार इतकी उजळणी होत असते कीं आतां त्या बाबतींत अज्ञात असें कांहींही राहिलेलें नाहीं. असें असतांनाही कोणी मुक्त झाल्याचें अजूनही ऐकू येत नाहीं. मग श्रीकृष्णजन्म व त्यांचें कर्म यांचें दिव्यरहस्य आपण समजतों त्यापेक्षां वेगळें असें कोणतें असेल कीं, जें जाणल्यानें मोक्षाला अथवा भारतीय कल्पनेप्रमाणें विकसनाच्या अत्युच्च पायरीला तें जाणणारा जाऊन पोहोंचण्याची शक्यता आहे? अवतार, त्याचें जन्मणें अथवा अवतीर्ण होणें, बाह्यस्वरूपापेक्षांही वेगळीं अशीं त्याचीं कर्में यांचें स्वरूप काय असावें, हें समजावून घेण्याचा प्रयत्न करणें आवश्यक आहे. आपल्या हिंदुस्थान देशांत अतिशय प्राचीन काळापासून अवतारकल्पना रूढ झालेली आहे. व तीही अवतारकल्पना खास परमेश्वरी शक्ति मानवी स्वरूपांत आविष्कृत होते अशा समजुतीनें रूढ झालेली आहे. आजच्या विशिष्ट संस्कारांत वाढलेल्या मनाला अवतारवादाचें स्वरूप समजावून घेणें व त्याहीपेक्षां तें मान्य करणें मोठें अवघड आहे. मनुष्य आपल्या स्वतंत्र बुद्धीची केवढीही ऐट मिरवीत असला तरी वस्तुतः त्याची बुद्धि संस्कारपरतंत्र असते हीच गोष्ट खरी आहे. जसे संस्कार असतील तदनुरूपच तर्कपद्धतीचें ग्रहण होतें. एक दृष्टिकोन तयार होतो व त्याच्या सारणींतूनच कोणत्याही गोष्टी मान्य अथवा अमान्य करण्यांत येत असतात. त्यामुळें जुन्या मनुष्यास अवतारवादाविरुद्धचा युक्तिवाद पटणें वा ग्रहण करणें जितकें अशक्य तितकेंच आजच्या जगांतल्या मनास अवतारवादाचा युक्तिवाद व त्यांतील दृष्टिकोन पटणें, इतकेंच नव्हे तर समजणें हेंही अवघड होऊन बसतें. यांत वस्तुतः कोणाच्या दोषाचा वा गुणाचा संबंध

नाहीं. संस्कारामुळें विशिष्ट धारणेचें क्षितिज अंतःकरणाभोंवतीं आपोआपच तयार होतें. व त्याच्या पलीकडे मनुष्य सहसा पाऊल टाकूं शकत नाहीं. आज दीडशें वर्षांच्या पाश्चात्य शिक्षणप्रणालीमुळें जुन्या निष्ठांच्या व धारणांच्या जगांतून वेगळ्या स्वरूपाच्या निष्ठांच्या व धारणांच्या जगांत भारतीय मनानें प्रवेश केलेला आहे. मग कोणाच्या मतें तें तमोयुगांतून सूर्यप्रकाशाकडे येणें असेल तर कोणाच्या मतें ते प्रकाशांतून अंधाराकडे जाणेंही असूं शकेल! पण आपलें जुनें जग बदलून त्या जागीं धारणेचें व निष्ठेचें नवें जग उत्पन्न झालें आहे ही गोष्ट मात्र निःसंशय खरी आहे. या नव्या जगांतील आपल्या या धारणेचा मुख्य पाया भौतिक वाद असून त्या भौतिक वादानें आपणांस सत्यासत्यनिर्णयाचा वेगळा दृष्टिकोन दिलेला आहे. तो दृष्टिकोन असा आहे कीं, विज्ञानाच्या उपकरणांच्या साहाय्यानें जेवढें प्रत्यक्ष प्रयोगाअंतीं आपल्या प्रत्ययास येईल तेवढेंच खरें मानावयाचें व त्याहून वेगळें असें खरें मानावयाचें नाहीं. तसेंच उपकरणें व प्रत्यय यांनीं शक्याशक्यतेच्या ज्या मर्यादा उत्पन्न केल्या असतील त्या मर्यादांवरच तर्कशास्त्र उभारावयाचें, त्याच्या पलीकडच्या धारणा मान्य करावयाच्या नाहींत. यालाच बुद्धिवाद असें म्हणत असतात. ईश्वर बुद्धिवादानें सिद्ध होण्यासारखा नाहीं व संशोधनाच्या उपकरणांत तो बसूं शकत नाहीं अशा समजुतीनें बुद्धिवादी मनुष्य आधीं ईश्वर नांवाचीच कांहीं जाणती शक्ति असूं शकते या गोष्टीवरच मुळांत विश्वास ठेवूं शकत नाहीं तर तिच्या अवताराच्या संबंधीं विचारावयासच नको. 'अगा जें झालेंचि नाहीं। त्याची वार्ता पुससी काई?' अशी या बाबतींतील बुद्धिवाद्यांची धारणा आहे. देवच जगांत कोणी नसल्यामुळें मनुष्याच्या शरीरांत त्याच्या सामर्थ्याचा, वैशिष्ट्यांचा ज्ञानमयतेचा व प्रतापाचा आविष्कार होतो असें मानणें महामूर्खपणाचें आहे. विहिरींतच पाणी नाहीं तर पोहऱ्यांत कोठून येणार? बुद्धिवाद्यांतही दोन भाग आहेत. जड-चैतन्याच्या द्वंद्वापैकीं केवळ जडच सृष्टीचें मूळ आहे व चैतन्य हा त्याच्या विशिष्ट संघातानंतर उत्पन्न होणारा गुणधर्म आहे असें म्हणणारे भौतिकवादी

वरीलप्रमाणें प्रतिपादन करून गीतेंतील व भारताच्या संहितेंतील हें सारेंच वर्णन केवळ काव्यमय व मूर्खपणाच्या जनश्रद्धेच्या आधारावर उत्पन्न झालेलें आहे, त्याला खरें मानणें हा केवळ भ्रम आहे असें म्हणून मोकळे होतील. यापेक्षां वेगळ्या धारणेचे जे बुद्धिवादी आहेत त्यांच्या मतें जड-चैतन्याच्या द्वंद्वांत जड हेंच मूल तत्त्व व त्याच्या संघाताचाच परिणाम म्हणजे चेतन असा आग्रह धरण्याची कांहीं एक आवश्यकता नसून हीं दोन्हीं तत्त्वें नित्य आहेत अथवा चेतन हेंच मूलतत्त्व आहे. त्यांचाही अवतारकल्पनेला विरोध आहेच. अर्थात् तो वेगळ्या भूमिकेवरून आहे. त्यांच्या मतें या चेतनतत्त्वालाच अथवा सृष्टींतील यच्चयावत् सामर्थ्यशील गतिमयतेला तुम्ही ईश्वर समजत असाल तर तो ईश्वर अथवा देव जगाच्या फापटपसाऱ्याहून वेगळा व त्यापेक्षां अधिक श्रेष्ठ असें तत्त्व असला पाहिजे. अशा स्थितींत त्यानेंच उत्पन्न केलेल्या या विश्वरूपी यंत्राला त्याच्या नियमाप्रमाणें तो चालूं देणार हें उघड आहे. जगाच्या नियमनाच्या मूळ घटनेला गति दिल्यावर पुन्हां तो दैनंदिन व व्यावहारिक क्षेत्रांतल्या घटनांच्या भानगडींत पडणें सर्वस्वी असंभवनीय आहे. गति देणारें मूळ सामर्थ्य या दृष्टीनें तो फक्त साक्षीरूप होऊन राहील. इतर भानगडींत तो पडणें संभवनीय असूं शकत नाहीं. ज्याप्रमाणें इंग्लंडमधील राजा हा घटनेप्रमाणें राजा असला तरी व्यवहारांत त्याचा संबंध शून्य आहे, तशीच ईश्वराच्या संबंधांतील वस्तुस्थिति आहे. शुद्ध चैतन्य, मर्यादित शरीरांत बुद्धया येईल कशास्तव ? अमर्यादाला मर्यादा घालणें, जन्माचा संबंध नसलेल्याला जन्म चिकटविणें, व मूलतत्त्वाला मानवी शरीराच्या आकारांत वारंवार प्रकट होत राहण्याची इच्छा कल्पिणें निव्वळ तर्कदुष्ट ठरेल. याहून वेगळ्या पद्धतीचें परंतु ख्रिश्चन धर्माच्या देवत्वाच्या कल्पनेवरून ज्यांनीं उपासनेची व ईश्वरभक्तीची देणगी घेतली आहे त्यांच्या मतें ईश्वर व त्याचीं कार्यें आणि गुणधर्म, व मनुष्य, त्याच्या मर्यादा व त्याचे गुणधर्म यांच्या एकीकरणाची कल्पना ईश्वराचा अपमान करणारी व त्यांचें विडंबन करणारी ठरते. त्यामुळें अवतारकल्पना सर्वस्वीं अग्राह्य आहे.

भारतवर्षांतील आजचीं मतें सामान्यतः या वरील तीन प्रवाहांच्या संस्कारांनीं संस्कारित झालेलीं आहेत. त्यामुळें त्यांना अवतारकल्पना ग्रहण करणें व मान्य करणें ही गोष्ट जवळजवळ अशक्य वाटावी अशी आहे. एका वेगळ्या अर्थानें या गोष्टीकडे पहातां येईल काय व आजच्या संस्कारांचा पूर्ण परिचय असलेल्या एखाद्या व्यक्तीला पहातां येईल काय हा मोठा प्रश्न आहे. भारतांतील नुकतेच ब्रह्मीभूत झालेले योगी अरविंद घोष हे इंग्लंडमध्यें राहून सर्व शिक्षण घेतलेले, एकदां राजकारणांत अतिशय थोर नेतृपदास चढलेले, सर्व प्रकारच्या भौतिक शोधांचा व शास्त्रांचा अभ्यास केलेले व जीवनांतील सर्व ईषणांचा त्याग करून योगमार्गानें परमेश्वरसाक्षात्काराचा प्रयत्न करण्यांत व भारतीय संस्कृतींतील मूलतत्त्वांचा साक्षात् प्रत्यय घेण्याच्या मार्गांत संपूर्ण जीवन व्यतीत केलेले असे महापुरुष आहेत. त्यांनीं श्रीकृष्णांचे उद्‌गार व आजचे संस्कार या दोहोंचाही गंभीर विचार करून आपल्या पद्धतीनें अवतारवादाचें रहस्य उलगडून दाखविलें आहे. भगवान् श्रीकृष्णांचें जीवन असें आहे कीं, अवतारवादावर किंवा ईश्वरकल्पनेवर मुळींच विश्वास न ठेवणाऱ्या शुद्ध जडवाद्यालाही त्या जीवनांतून कल्याणमार्गाचें मार्गदर्शन निश्चित मिळू शकेल.. त्यामुळें त्यांच्या दृष्टीनें अवतारवादाच्या रहस्याच्या विश्लेषणाची मुळींच आवश्यकता नाहीं. पण अवतारकल्पना ज्यांना ज्ञानाची पिपासा म्हणून देखील समजावून घ्यावयाची असेल त्यांच्या दृष्टीनें अरविंदांचें हें विवेचन निःसंशय विचारणीय आहे. मग जे अवतारवादावर विश्वास ठेवीत असतील त्यांना तर तें निश्चितच महत्त्वाचें वाटेल. अरविंद काय म्हणतात तें आपण पाहूं.

## अरविंदांचा अवतारवाद

आपल्या Essays on Gita या ग्रंथांत अवतारवाद मांडतांना श्री. अरविंद म्हणतात :–

"But we have to remark carefully that the upholding of Dharma in the world is not the only object of the descent

of the Avatar, that great mystery of the Divine manifest in humanity; for the upholding of the Dharma is not an all-sufficient object in itself, not the supreme possible aim for the manifestation of a Christ, a Krishna, a Buddha, but is only the general condition of a higher aim and a more supreme and divine utility. For there are two aspects of the divine birth; one is a descent, the birth of God in humanity, the Godhead manifesting itself in the human form and nature, the eternal Avatar; the other is an ascent, the birth of man into the Godhead, man rising into the divine nature and consciousness, *madbhavam agatah;* it is the being born anew in a second birth of the soul. It is that new birth which Avatarhood and the upholding of the Dharma are intended to serve."

(Essays on Gita–Page 132)

"For in the Vedantic view of things all these apparently formidable objections are null and void from the beginning. The idea of the Avatar is not indeed indispensable to its scheme, but it comes in naturally into it as a perfectly rational and logical conception. For all here is God, is the Spirit or self-existence, is Brahman, *ekamevadwitiyam,* there is nothing else, nothing other and different from it and there can be nothing else, can be nothing other and different from it; Nature is and can be nothing else than a power of the divine consciousness, all beings are and can be nothing else than inner and outer, subjective and objective soul-forms and bodily forms of the divine being which exist in or result from the power of its consciouness. Far from the Infinite being unable to take on finiteness, the whole universe is nothing else but that; we can see, look as we may, nothing else at all in the whole wide world we inhabit. Far from the spirit being incapable of form or disdaining to connect itself with form of matter or mind and to assume a limited nature or a body, all here

is nothing but that the world exists only by that connection, that assumption. Far from the world being a mechanism of law with no soul or spirit intervening in the movement of its forces or the action of its minds and bodies,—only some original indifferent spirit passively existing somewhere outside or above it,—the whole world and every particle of it is on the contrary nothing but the divine force in action and that divine force determines and governs its every movement, inhabits its every form, possesses here every soul and mind; all is in God and in him moves and has its being, in all he is, acts and displays his being; every creature is the disguised Narayana.

Far from the unborn being unable to assume birth, all beings are even in their individuality unborn spirits, eternal without beginning or end, and in their essential existence and their universality all are the one unborn spirit of whom birth and death are only a phenomenom of the assumption and change of forms. The assumption of imperfection by the perfect is the whole mystic phenomenom of the universe; but the impertection appears in the form and action of the mind or body assumed, subsists in the phenomenom,—in that which assumes it there is no imperfection, even as in the Sun which illumines all there is no defect of light or of vision, but only in the capacities of the individual organ of vision. Nor does God rule the world from some remote heaven, but by his intimate omnipresence; each finite working of force is an act of infinite force and not of a limited separate self-existent energy labouring in its own underived strength; in every finite working of will and knowledge we can discover supporting it, an act of the infinite all-will and all-knowledge. God's rule is not an absentee, foreign and external government; he governs all because he exceeds all, but also because he dwells within all movements and is their

absolute soul and spirit. Therefore none of the objections opposed by our reason to the possibility of Avatarhood can stand in their principle; for the principle is a vain division made by the intellectual reason which the whole phenomenon and the whole reality of the world are busy every moment contradicting and disproving.

( Essays on Gita Page 135-136 )

Now it is notable that with a slight but important variation of language the Gita describes in the same way both the action of the Divine in bringing about the ordinary birth of creatures and his action in his birth as the Avatar. "Leaning upon my own Nature, "*Prakritim swam avashtabhya*" it will say later "I loose forth variously, *visrijami* this multitude of creatures helplessly subject owing to the control of prakriti, *avasam prakriter vasat*" "standing upon my own Nature" it says " I am born by my self-Maya, *prakritim swam adhishthaya*..*atmamayaya*, I loose forth myself, *atmanam srijami*." The action implied in the word *avashtabhya* is a forceful downward pressure by which the object controlled is overcome, oppressed, blocked or limited in its movement or working and becomes helplessly subject to the controlling power, *avasam vasat*. Nature in this action becomes mechanical and its multitude of creatures are held helpless in the mechanism, not lords of their own action. On the contrary the action implied in the word *adhishthaya* is a dwelling in, but also a standing upon and over the Nature, a conscious control and government by the indwelling Godhead, *adhishtatri devata* in which the Purusha is not helplessly driven by the Prakriti through ignorance, but rather the Prakriti is full of the light and the will of the Purusha Therefore in the normal birth that which is loosed forth,–created, as we say,– is the multitude of creatures or becomings, *bhutagramam;* in the divine birth that which is loosed forth, self-created,

is the self-conscious self-existent being, *atmanam;* for the vedantic distinction between *atma* and *bhutani* is that which is made in European philosophy between the Being and its becomings. In both cases Maya is the means of the creation or manifestation but in the divine birth it is by self-Maya, *atmamayaya* not the involution in the lower Maya of the ignorance, but the conscious action of the self-existent Godhead in its phenomenal self-representation, well aware of its operation and its purpose,–that which the Gita calls elsewhere Yogamaya. In the ordinary birth Yogamaya is used by the Divine to envelop and conceal itself from the lower consciousness, so it becomes for us the means of the ignorance, avidya-maya; but it is by this same Yogamaya that self-knowledge also is made manifest in the return of our consciousness to the Divine, it is the means of the knowledge, Vidyamaya; and in the divine birth it so operates as the knowledge controlling and enlightening the works which are ordinarily done in the Ignorance."

—( Essays on Gita–Page– 139 )

But it is to assist that ascent or evolution the descent is made or accepted; that the Gita makes very clear. It is we might say, to exemplify the possibility of the Divine manifest in the human being, so that man may see what that is and take courage to grow into it. It is also to leave the influence of that manifestation vibrating in the earth-nature and the soul of that manifestation presiding over its upward endeavour. It is to give a spiritual mould of divine manhood into which the seeking soul of the human being can cast itself. It is to give a dharma, a religion, not a mere creed; but a method of inner and outer living, a way, a rule and law of self-moulding by which he can grow towards divinity. It is too, since this growth, this ascent is no more isolated and individual phenomenon, but like a

in the divine world–activities a collective business, a work and the work for the race, to assist the human march, to hold it together in its great crises, to break the forces of the downward gravitation when they grow too insistent, to uphold or restore the great dharma of the Godward law in man's nature, to prepare even, however far off, the kingdom of God, the victory of the seekers of light and perfection, *sadhunam*, and the overthrow of those who fight for the continuance of the evil and the darkness. All these are recognised objects of the descent of the Avatar, and it is usually by his work that the mass of men seek to distinguish him and for that, that they are ready to worship him. It is only the spiritual who see that this external Avatarhood is a sign, in the symbol of a human life, of the eternal inner Godhead making himself manifest in the field of their own human mentality and corporeality so that they can grow into unity with that and be possessed by it."

—(Essays on Gita Page–142-143)

"The Avatar is at the same time the Vibhuti. This Krishna who in his divine inner being is the Godhead in a human form, is in his outer human being the leader of his age, the great man of the Vrishnis." (Page 143)

" But still the Vibhuti is not the Avatar; otherwise Arjuna, Vyasa, Ushanas would be Avatars as well as Krishna, even if in a less degree of the power of Avatarhood. The divine quality is not enongh; there must be the inner consciousness of the Lord and Self governing the human nature by his divine presence. The heightening of the power of the qualities is part of the becoming, *bhutagrama*, an ascent in the ordinary manifestation; in the Avatar there is the special manifestation, the divine birth from above, the eternal and universal Godhead descented into a form of individual humanity, *atmanam srijami*, and

conscious not only behind the veil but in the outward nature." (Page 144)

"But also the higher divine consciousness of the Purushottama may itself descend into the humanity and that of the Jiva disappear into it. This is said by his contemporaries to have happened in the occasional transfigurations of Chaitanya when he who in his normal consciousness was only the lover and devotee of the Lord and rejected all deification, became in these abnormal moments the Lord himself and so spoke and acted, with all the outflooding light and love and power of the divine Presence, Supposing this to be the normal condition, the human receptacle to be constantly no more than a vessal of this divine Presence and divine Consciousness, we should have the Avatar according to this intermediary idea of the incarnation. That easily recommends itself as possible to our human notions; for if the human being can elevate his nature so as to feel a unity with the being of the Divine and himself a mere channel of its consciousness, light, power, love, his own will and personality lost in that will and that being;,-and this is a recognuised spiritual status, then there is no inherant impossibility of the reflex action of that Will, Being, Power, Love, Light, Consciousness, occupying the whole personality of the human Jiva. And this would not be merely an ascent of our humanity into the divine birth and the divine nature, but a descent of the divine Purusha into humanity, an Avatar."

(Page 145–146)

The Avatar does not descend merely for a great outward action, as the pragmatic sense in humanity is too often tempted to suppose. (Page 150)

Where indeed, the change is mainly intellectual and practical, the intervention of the Avatar is not needed; there is a great uplifting of conciousness, a great manifestation

**of power in which men are for the time being exa ted above their normal selves, and this surge of consciousness and power finds its wave-crests in certain exceptional individuals, *vibhutis* whose action leading the general action is sufficient for the change intended. The Reforma-**tion in Europe and the French Revolution were crisis of this character; they were not great spiritual events, but intellctual and practical changes, one in religious, the other in social and political ideas, forms and motives, and the modification of the general consciousness brought about was a mental and dynamic, but not a spiritual modi-fication. But when the crisis has a spiritual seed or intention, then a complete or a partial manifestation of the God-consciousness in a human mind and soul comes as its originator or leader. That is the Avatar." (Page 150-151)

"The Avatar comes to reveal the divine nature in man above this lower nature and to show what are the divine works, free, unegoistic, disinterested, impersonal, universal, full of the divine light, the divine power and the divine love. He comes as the divine personality which shall fill the consciousness of the human being and replace the limited egoistic personality, so that it shall be liberated out of ego into infinity and universality, out of birth into immortality." (Page 156)

"पण आपण हें सावधगिरीनें ध्यानांत ठेवलें पाहिजे कीं, जगांत धर्माचें पुनरुज्जीवन हेंच अवताराचें अथवा दैवी सामर्थ्यानें मानवी आविष्कारांत प्रकट होण्याच्या गूढाचें एकमात्र कारण अथवा हेतु नाहीं. कारण कीं धर्माचें पुनरुज्जीवन हें स्वयमेव पूर्णतया स्वयं-पूर्ण असें श्रीकृष्णाच्या आविष्काराचें कारण असू शकत नाहीं. अतिशय श्रेष्ठ व दैवी उपयुक्ततेसाठीं आवश्यक असें उच्च वाता-वरण सर्वसाधारणपणें निर्माण करणें ही गोष्ट धर्माच्या पुनरु-ज्जीवनानें होऊं शकते. दैवी जन्म दोन प्रकारें होतो. एक तर

ईश्वर स्वत: मानवतेंत अवतीर्ण होतो आणि मानवी आकारांत व वैशिष्टयांत त्याचें शाश्वत स्वरूप वावरतें. दुसरा प्रकार म्हणजे मानवांतून देवत्व उत्पन्न होणें. मनुष्याचेंच ज्ञान व स्वभाववैशिष्टय दैवी अवस्थेंत रूपांतरित होणें हा प्रकार होय. पहिल्या प्रकारांत स्वत: परमेश्वरच मानवी आकारानें वावरतो, तर दुसऱ्यांत मूळच्या मानवाच्या स्वभावाचें व ज्ञानशक्तीचें पूर्ण दैवी अवस्थेंत रूपांतर होतें. ( यालाच उद्धार असें म्हणतात.) 'मद्‌भावं आगता:' हें याच अभिप्रायानें भगवंतांनीं म्हटलें आहे. हाच जीवात्म्याचा दुसरा जन्म म्हटला पाहिजे. हा दुसरा जन्म अथवा ही विशिष्ट अवस्था मानवांत उत्पन्न करण्यासाठीं म्हणजे मानवी जीवनाचें देवजीवनांत रूपांतर करण्यासाठीं अवतार होत असतो. अवताराचा व धर्माच्या पुनरुज्जीवनाचा हाच खरा हेतु व हेंच कार्य आहे.

"वेदांताच्या दृष्टिकोनानुसार अवतारवादावर घेण्यांत येणारे आक्षेप निर्मूल ठरतात. अवताराची कल्पना ही वेदांतांत अटळ आहे असें नाहीं. पण ती स्वाभाविकपणेंच त्यांतून उत्पन्न झालेली आहे व ती पूर्णपणें तर्कशुद्ध व बुद्धिवादाला धरूनही आहे. सर्व कांहीं परमेश्वर, चैतन्य व सत्ता मात्र परमेश्वर आहे अथवा सर्वच ब्रह्म आहे हें 'एकमेवाद्वितीयम्' या सिद्धांताचें वेदांताचें तत्त्व आहे. ब्रह्मावांचून वेगळें दुसरें कांहीं असूंच शकत नाहीं. ह्या वेदांताच्या सिद्धांताप्रमाणें दैवी ज्ञानमयतेच्याहून निसर्ग वेगळा नाहीं व असूंही शकत नाहीं. सर्व प्रकारचें बाह्य आणि आंतर अस्तित्व विषय व हेतुभूत असें सर्व प्रकारचें आंतरजीवनाचें विशिष्ट तत्त्व अथवा बाह्य स्थूल शरीराचे भिन्नभिन्न आविष्कार हे परमेश्वरी अस्तित्वावांचून अथवा त्याच्या ज्ञानमय अवस्थेच्या सामर्थ्याचे वेगवेगळे आविष्कार या नात्यावांचून दुसरें कांहीं नाहीं व असूंही शकत नाहीं. या ठिकाणीं, अमर्यादानें मर्यादित होण्याचा मुळींच प्रश्न उद्‌भवत नाहीं. अमर्याद मर्यादित होईल कसें? अशी शंका या दृष्टिकोनानुसार संभवूंच शकत नाहीं. कारण कीं संपूर्ण विश्वांत त्या एका गोष्टीवांचून दुसरें कांहीं नाहींच. मग कोणी कांहीं होण्याचा प्रश्न कोठें उत्पन्न होतो? या विस्तीर्ण विश्वांत आप-

आपल्या दृष्टिकोनानुसार आपण काय हवें त्या पद्धतीनें पाहिलें तरी, व तें कोणत्याही स्वरूपांत आपल्याला दिसलें तरी त्यामुळें 'एकं एव अद्वितीयम्' या वस्तुस्थितींत कांहींही फरक पडूं शकत नाहीं. चैतन्यानें एखादा आकार धारण करणें अथवा जडाच्या व मनस्तत्त्वाच्या आकारांत स्वत:ला गुंतवून मर्यादित शरीरांत व वस्तुस्थितींत वावरणें हा प्रश्नच येथें संभवत नाहीं. कारण कीं जगाचें सारें अस्तित्व म्हणजे केवळ परमेश्वरीच अस्तित्व. दुसरें कांहीं नाहीं. तसेंच जग आपल्या निसर्गाच्या नियमानुसार एखाद्या यंत्राप्रमाणें चालतें. चैतन्य वा आत्मा त्याच्या गतींत, प्रत्यक्ष कार्यांत व त्याला कारणीभूत होणाऱ्या शरीराच्या व मनाच्या कार्यांत आणि या सर्वांना हेतुभूत असलेल्या प्रेरणांत कांहींही अडथळा करीत नाहीं. मूळ तत्त्व असलेली चैतन्यमयता फक्त अप्रत्यक्षपणें आपलें अस्तित्व, याच्या बाहेर व अंतिम स्वरूपांत प्रकट करते याही गोष्टींत कांहीं अर्थ नाहीं. उलट संपूर्ण विश्व आणि त्यांतील प्रत्येक वस्तुजात म्हणजे एका दैवी प्रेरणेच्या कार्यान्वित होण्यावांचून दुसरें कांहीं नाहीं. दैवी प्रेरणेची कार्यान्वितता किंवा गतिमयता म्हणजेच संपूर्ण जग आहे. तें दैवी सामर्थ्यच जगांतील प्रत्येक हालचालींचें नियंत्रण करतें. प्रत्येक आकार उत्पन्न करतें. प्रत्येक जीव व मनावर अधिकार गाजवितें. सर्व कांहीं परमेश्वरी सत्तेंत अंतर्भूत असून त्याच्यांतच हालचाल करतें किंबहुना तोच या रूपानें सर्व कांहीं आहे. प्रत्येक वस्तुजातांत तो आहे व तोच क्रियारूपानें आपलें अस्तित्व खेळवितो. प्रत्येक उत्पन्न झालेलें वस्तुजात म्हणजे त्या रूपानें नटलेला नारायणच आहे. परमेश्वर जन्म घेऊं शकतो कीं नाहीं व तो जन्म घेतो कीं नाहीं हे प्रश्न तर दूरच राहिले. पण प्रत्येक लहान मोठें अस्तित्व हें स्वतंत्र-पणें सुद्धां वस्तुत: न जन्म पावणारी चैतन्यशक्ति, आदिअंतहीन अशी शाश्वतता आणि त्याच्या मर्यादित व विश्वमय अशा दोन्ही दृष्टींनीं असलेल्या अस्तित्वांत केवळ कधींही न जन्मणारें चैत-न्यच आहेत. तेथें जन्मही नाहीं आणि मरणही नाहीं. केवळ आका-रांत फरक पडल्यामुळें लादलेले हे वृथा आरोप आहेत. पूर्णतेनें

अपूर्णतेचा हा बुरखा घेणें हेंच विश्वाचें खरें गूढ आहे. पण अपूर्णतेची ही कल्पना मनाच्या व शरीराच्या आकाराला नि क्रियेला धरूनच गृहीत धरण्यांत आलेली आहे. पण या रूपानें वस्तुतः जी खरी अवस्था आहे ती मात्र पूर्णच आहे. सूर्यांत अथवा त्याच्या तेजस्वितेंत प्रकाश व दृष्टि या दोन्हीं दृष्टींनी कांहींच फरक नाहीं. फक्त त्याच्याकडे पहाणाऱ्या व्यक्तिमात्राच्या दृष्टिकोनामुळें ती परिभाषा उत्पन्न होत असते. देव दूरच्या स्वर्गांतून विश्वाचें राज्य करीत नसून तो अत्यंत निकट आहे. मर्यादित क्रियेंतील प्रत्येक प्रेरणा त्या अमर्यादित प्रेरणेचाच भाग आहे. अथवा वस्तुतः ती मर्यादातीत प्रेरणाच होय. मर्यादित अस्तित्वांतील एखादें सामर्थ्य आपल्या स्वयंभू शक्तीनें काम करतें आहे अशा रीतीची कोणतीही अवस्था नाहीं. ज्ञान व इच्छा यांतून उत्पन्न झालेल्या प्रत्येक मर्यादित क्रियेंत तिला साहाय्य करणारी सर्व ज्ञानमयता व मर्यादातीत अशी संपूर्ण इच्छाशक्ति आहे हें आपण पाहूं शकतों. देवाचें अधिराज्य हें कांहीं तरी बाह्य, परकें व दुरून चालणारें असें नाहीं. तो सर्वांच्यावर अधिराज्य गाजवितो. कारण कीं तोच सर्वांत आहे इतकेंच नव्हे तर सर्व प्रकारच्या क्रियेंतून तोच डोकावत असून प्रत्येकाचा खरा आत्मा व चैतन्यशक्ति तोच आहे. म्हणून आपल्या सारासार विचारशक्तीनें अवताराच्या शक्याशक्यतेसंबंधीं उत्पन्न केलेल्या सर्व शंका वेदांताच्या या मतप्रणालीसमोर टिकूं शकत नाहींत.

"ही गोष्ट लक्षांत ठेवण्यासारखी आहे कीं सूचक, संक्षिप्त पण महत्त्वाच्या शब्दांत भगवद्गीतेनें परमेश्वर सामान्य जीवांना जन्म कसा देतो व त्याचा जन्म कोणत्या पद्धतीनें होतो ही गोष्ट सूचित केली आहे. 'प्रकृतिं स्वां अधिष्ठाय' या शब्दांत मी माझ्या स्वतःच्या प्रकृतीवर नियंत्रण करतों हें त्यांनीं सूचित केलें आहे. पुन्हां ते असें म्हणतात कीं माझ्या स्वतःच्या नैसर्गिकतेवर मी माझीच सत्ता चालवून अथवा तिचा अंगीकार करून स्वतःच स्वतःला उत्पन्न करतों. 'अधिष्ठाय' या शब्दांत जन्माचा जो मूलभूत हेतु तो पूर्णपणें परमेश्वराच्या स्वाधीन आहे असें ते सांगत

आहेत. अधिष्ठाय या शब्दानें प्रकृतीच्या सामर्थ्याला सर्वस्वीं नियंत्रित करून पूर्णपणें आपल्या स्वाधीन कसें करून घेण्यांत आलें आहे हें सूचित होतें. अधिष्ठाय या शब्दांत नियंत्रित सत्ता नियंत्रकाच्या पूर्णपणें आधीन होणें, नियंत्रकानें तिला मर्यादा घालणें, नियंत्रित वस्तूच्या प्रत्येक क्रियेवर व वैशिष्ट्यावर नियंत्रकाची सत्ता चालणें, व अवशतेनें त्या वस्तूनें पूर्णपणें आपल्या नियंत्रकाच्या आधीन होऊन राहणें या गोष्टी येतात. जगांत आपण असें पाहतों कीं निसर्ग हा यंत्राप्रमाणें असून सर्व जीवजात अथवा भूतमात्र अवशतेनें त्या निसर्गयंत्राच्या आधीन असतात. ते कांहीं स्वतःचे मालक नसतात. याच्या बरोबर उलट 'अधिष्ठाता' या शब्दानें निसर्गांत राहणें पण त्याच्यापेक्षां वर आणि त्याच्यावर अधिराज्य गाजवून राहणें, पूर्णपणें समजून उमजून त्याच्यावर नियंत्रण घालणें आणि अधिराज्य गाजविणें या गोष्टी सूचित होतात. प्रकृतीची अधिष्ठात्री देवता म्हणून परमेश्वर जन्म घेतात. जीवांत व या अवस्थेंत काय फरक असेल ? इतरांप्रमाणें या ठिकाणीं पुरुष अवशतेनें प्रकृतीकडून अज्ञानाच्या मार्गानें वागविला जात नाहीं. उलट प्रकृतीच प्रकाशमयतेनें भरून जाऊन तिची प्रत्येक हालचाल पुरुषाच्या इच्छाशक्तीनें नियंत्रित केली जाते. म्हणून सामान्य जीवांचे जन्म हे प्रकृतीकडून केले जातात. अवशतेनें त्यांना जन्मावें लागतें. ते जन्म होतात. पण परमेश्वराचा अवतार अथवा जन्म हा कोणी केलेला नसून त्यानें स्वतःच स्वतःला जन्माला घातलें आहे. कारण त्याच्यावर नियंत्रक सत्ता कोणाचीही नाहीं. पाश्चात्य तत्त्वज्ञानांत होणें व व्हावें लागणें यांत जी भिन्नता तीच जन्म घेणें व जन्मणें यांतील भिन्नता होय. वस्तुतः दोन्ही गोष्टींत उत्पत्तीचें अथवा आविष्काराचें कारण माया हेंच आहे. पण दैवी जन्मांत अज्ञानाच्या साहाय्यानें कार्य घडून आणणाऱ्या अविद्येचें स्थान नसून आत्ममायेचें स्थान आहे. दैवी जन्माच्या क्रियेंत स्वतःसिद्ध परमेश्वराच्या इच्छाशक्तीचाच केवळ संबंध असल्यामुळें आपल्या जन्माचा हेतु व घडवून आणावयाचें कार्य या विषयांत स्वयंपूर्ण जागरूकता असते. या इच्छाशक्तीलाच योग-

माया असें म्हटलेलें आहे. इतर जन्मांत मायाशक्तीचें हें विशिष्ट स्वरूप राहात नसून अज्ञानाच्या आश्रयानें तिचा आविष्कार होत असतो. येथें मात्र तिचें अधिष्ठान ज्ञान हेंच असतें. म्हणून या अवस्थेंतील त्या शक्तीला विद्यामाया असें म्हणतात. इतर जन्मांतही क्रिया होतात. पण त्या पूर्ण अज्ञानांत व अवशतेनें घडल्या जातात. अवतारांत मात्र ज्ञानमयतेनेंच प्रत्येक क्रियेचें नियंत्रण केलें जातें. तिच्यांत प्रकाश भरला जातो. अवतारामध्यें मानवतेंत देवत्व उत्पन्न करणें व तेथपर्यंत तिचें विकसन घडवून आणणें ही गोष्ट गृहीत असते. किंबहुना त्यासाठींच अवतार होत असतो हें गीतेनें स्पष्ट केलें आहे. देवानें घेतलेल्या मनुष्यरूपांतून मनुष्याच्या आकारांत दैवी जीवन कसें असतें तें मनुष्यानें पहावें, अनुभवावें, व धैर्य आणि स्फूर्ति घेऊन स्वत:मध्येंही तसें परिवर्तन घडवून आणावें हाच परमेश्वरानें मानवी स्वरूप धारण करण्यांतील खरा हेतु असतो. सामान्य जीवनांत अथवा जडजीवनांत स्वत:वर नेहमींच असणारें नैसर्गिकतेचें वजन बाजूला करून प्रकृतीवर नियंत्रण घालणारें आत्म्याचें स्वयंभू सामर्थ्य उलट त्या नैसर्गिकतेवर स्वत:चें आधिपत्य कसें गाजवितें हें दाखवून देणें हा अवताराचा हेतु असतो. आध्यात्मिक प्रवृत्तीचा संपूर्ण आविष्कार त्यांत केला जातो. धर्माचा जो उद्धार येथें अभिप्रेत आहे तो केवळ एक संप्रदाय म्हणून नव्हे, तर पूर्ण देवजीवन उत्पन्न होण्यासाठीं आवश्यक त्या आंतर्बाह्य अशा जीवनपद्धतीचा मार्ग या अर्थानेंच येथें धर्माचें पुनरुज्जीवन म्हटलें आहे. धर्म म्हणजे तो बाह्य व आंतर आचार, कीं ज्यामुळें सारी जडता पार निघून जाऊन पूर्ण देवजीवन उत्पन्न होईल. शिवाय हें कार्य एखाद्या व्यक्तीपुरतें नसून संपूर्ण मानवतेसाठीं आहे. संपूर्ण मानवतेंत व तिच्या निसर्गांत असलेली जडता काढून टाकून त्या ठिकाणीं पूर्ण देवत्व उत्पन्न करावयाचें म्हणजे त्याच्या मार्गांआड येणारे सारे अडथळेही दूर करणें आवश्यक असतें. किंबहुना खऱ्या अर्थानें देवाचें राज्य अथवा मानवतेंत देवत्वाचा पूर्ण विकास करावयाचा असला तर पूर्णता व प्रकाश यांची इच्छा करणाऱ्या अथवा त्यासाठीं तळमळणाऱ्या

लोकांना विजय प्राप्त करून देणें व त्यांच्या आड येणाऱ्या अंधाराला आणि दुष्प्रवृत्तींना नष्ट करणें आवश्यक असतें. म्हणूनच 'परित्राणाय साधूनां विनाशाय च दुष्कृताम्' असें म्हटलें आहे. अवताराचें कार्य म्हणूनच देवजीवनाची प्रस्तावना, तें उत्पन्न करूं इच्छिणाऱ्या मानवांना म्हणजेच साधूंना संरक्षण व मानवांची ही प्रगति होऊंच द्यावयाची नाहीं अशा कृतनिश्चयानें तिच्यांत अडथळा उत्पन्न करूं इच्छिणाऱ्या प्रतिगामी शक्तींचा नायनाट असें त्रिविध आहे. लोक या कार्यावरूनच त्याची पूजा करतात. बहुतेक लोक धर्माची स्थापना, साधूंचें परित्राण, व दुर्जनांचा नाश यांचें स्थूल स्वरूप घेऊनच समाधान पावतात. आध्यात्मिक दृष्टीचे लोक मात्र या सर्व स्थूल क्रियांऐवजीं मनुष्यजीवनांत आलेल्या देवानें आपल्या मानवी प्रवृत्तींत फरक घडविण्यास सुरवात केली आहे हें ओळखून आपल्या जड जीवनाचें त्याच्या सामर्थ्यानें हळहळू देवजीवनांत रूपांतर होत आहे याचा प्रत्यय घेतात. अवतार त्याचवेळीं विभूतीही असूं शकतो. मनुष्याच्या आकारांत प्रकट झालेले भगवान् श्रीकृष्ण हे जसे पूर्ण परमेश्वर होते त्याप्रमाणेंच विभूति या नात्यानें ते त्यांच्या युगांतील युगपुरुष व वृष्णींच्या मधील सर्वश्रेष्ठ पुरुषही होते. म्हणजे ते एकाच वेळीं विभूतीही होते व अवतारही होते. त्यामुळें विभूति व अवतार दोन्हीही एकच आहेत असा अपसमज होण्याचा संभव असतो. पण विभूति म्हणजे अवतार नव्हे. नाहीं तर अर्जुन, व्यास, उषनस हेही अवतारच झाले असते. पण ते विभूती आहेत, अवतार नव्हेत. दैवी संपत्तीचे पुरुष हे विभूति होत. पण केवळ दैवी गुण असणें अवताराला पुरेसें नाहीं. पूर्ण ज्ञानमयता व आपल्या दैवी अस्तित्वानें जडप्रवाहाचें पूर्ण नियंत्रण करीत असल्याची अखंड जाणीव हीं अवताराचीं वैशिष्ट्यें आहेत. जन्म घेणाऱ्यांत अथवा सामान्य जीवांत आपल्या प्रवृत्तींना प्रयत्नपूर्वक आपण उच्चतेला नेत आहोंत अशी जाणीव असते. येथें अशा स्वतंत्रपणाची मुळींच आवश्यकता नसून मानवी आविष्कारांतील हें स्वत:सिद्ध सामर्थ्य नेहमींच अखंड जागरूक असतें. पुरुषोत्तमाची श्रेष्ठ दैवी ज्ञानमयता कधीं कधीं मानवतेंत येऊन त्याची

जीवत्वाची जाणीव नष्ट करते. नादीयाचे सत्पुरुष श्रीगौरांगप्रभु अथवा चैतन्यदेव यांच्या जीवनांतील अशा कांहीं गोष्टी प्रसिद्ध आहेत. नेहमींच्या जीवनांत ते परमेश्वराचे प्रेममय मार्गानें उपासना करणारे भक्त म्हणून त्याची उपासना करीत राहात पण कधीं कधीं पूर्ण दैवी आविष्कार होऊन स्वतःच परमेश्वर असल्याच्या जाणिवेनें ते बोलत व असें वागत कीं, ज्या अवस्थेंत पूर्ण प्रकाशमयता, दैवी प्रेम, व दैवी अस्तित्व प्रकट व्हावें. समजा कीं चैतन्याच्या ठिकाणीं कधीं कधीं थोडा वेळ प्रकट होणारीं ही अवस्था एखाद्या ठिकाणीं अखंड नांदत असली तर तेथील वस्तुस्थिति काय असेल? दैवी प्रवाहाचें वहन करणारें केवळ एक पात्र यापेक्षां तेथील मानवी आकाराचें व शरीराचें दुसरें कांहीं स्वरूप असूं शकेल काय? याच अवस्थेला अवतार असें म्हणतात. या देवतेशीं मानवता एकरूप होऊं शकते व तशी ती जर झाली तरच खरें विकसन झालें. किंबहुना ही दैवी ज्ञानमयता प्रकाश, सामर्थ्य नि प्रेम उत्पन्न होऊन, तिच्यांत आपल्या सर्व मर्यादा विलीन होऊन जाव्या याचें साधनयंत्र म्हणजेच मनुष्यजीवन आहे. त्या इच्छाशक्तीनें, अस्तित्वानें, सामर्थ्यानें, प्रेमानें, तेजानें व ज्ञानानें संपूर्ण मानवी जीव अथवा मानवी व्यक्तित्व भरून गेलेलें आढळतें. दिसावयास केवळ मानवी आकार पण त्यांतील इच्छा, अस्तित्व, सामर्थ्य, प्रेम, प्रकाश, व ज्ञान हें मात्र संपूर्ण दैवी, मानवी मर्यादितेचा अणुमात्रही गंध नसलेलें जेथें अखंडपणें असेल तो व्यक्तित्वाचा विकास नव्हे अथवा मानवी जीवनांतून देवत्वाचा झालेला प्रवासही नव्हे, तर तें खास देवाचेंच मानवांत येणें होय. अवतार तो हाच.

"अवतार कधींही केवळ स्थूल स्वरूपाच्या महत्कार्यार्थ होत नाहीं. पुष्कळ लोकांना तसें वाटतें, पण तें खरें नाहीं. केवळ बौद्धिक व व्यावहारिक क्षेत्रांत क्रांति घडवून आणण्यासाठीं अवताराच्या हस्तक्षेपाची आवश्यकता नाहीं. त्यासाठीं ज्या मोठ्या जागरूकतेची गरज असते, जो सामर्थ्याचा प्रवाह सर्व मानवांना आपल्याकडे खेंचण्यासाठीं या विशिष्ट परिवर्तनक्षणीं आवश्यक

असतो तो एखाद्या वैशिष्टयपूर्ण व्यक्तिमत्त्वाच्या साहाय्यानें प्रकट होऊं शकतो व मानवतेंत तेवढें परिवर्तन घडवून आणतो. यालाच आपण विभूति असें म्हणतों. युरोपांत उदय पावलेलें सुधारणा युग अथवा फरान्स देशांत झालेली राजक्रांति हे अशा तऱ्हेचे प्रसंग होत. ते कांहीं महत्त्वाचे आध्यात्मिक प्रसंग नव्हेत. ते बौद्धिक व व्यावहारिक क्षेत्रांतील परिवर्तन क्षण होत. पहिला प्रसंग हा धार्मिक क्षेत्रांतील आहे तर दुसरा सामाजिक व राजकीय क्षेत्रांतील विचारप्रणालींचा, स्वरूपांचा व हेतूंचा संघर्ष होय. अर्थातच या क्षणीं सर्वसाधारण मानवी ज्ञानशक्तींत घडवून आणण्यांत आलेला बदल कितीही स्फूर्तिशाली असला तरी तो बौद्धिक क्षेत्रांतील आहे. तो कांहीं आत्मिक वा आध्यात्मिक स्वरूपाचा नाहीं. पण ज्या क्रांतिक्षणांत आध्यात्मिकतेचीं बीजें वा हेतु असतात त्या वेळीं नेतृत्व पत्करावयास अथवा प्रवर्तक व्हावयास मानवी मनांत व जीवांत दैवी ज्ञानमयताच प्रकट होते. तिला अवतार असें म्हणतात.

अवताराचे येण्याचें खरें फळ त्यांच्याच पदरांत पडतें कीं जे त्याच्यापासून त्याच्या दैवी जन्माचें व दैवी कर्माचें हें रहस्य समजावून घेतात व आपल्या ज्ञानशक्तींत त्या दिव्यत्वाला पूर्णपणें आणून आपलें संपूर्ण जीवन त्याच्यांत विरवून तेथेंच आश्रय घेतात. जडता येथें पूर्णपणें दिव्यत्वांत विलीन केली जाते.'मद्‌भावमागताः मन्मया मामुपाश्रिताः ।' मानवी जीवनांत दैवी गुण विशेष उत्पन्न करून त्यांच्यांतील संपूर्ण पतितता व जडता घालवून टाकवावयास आणि दिव्य कर्म, पूर्ण स्वातंत्र्य, निरहंकारता, निर्ममता व्यक्तित्वशून्यता, विश्वरूपता, पूर्ण दैवी प्रकाशमयता,दैवी सामर्थ्य व दैवी प्रेम म्हणजे काय हें प्रत्यक्ष दाखवण्यास अवतार होत असतो. मानवी जीवनांतील मर्यादित अहंकारी व्यक्तिवाद व त्याच्यावरच आधारलेलें ज्ञानाचें स्फुरण नष्ट करून मर्यादातीतता, विश्वरूपता, व अमरत्व हे मानवी जीवनांत निर्माण करणें हाच

